**“महाराष्ट्र भूषण” पुरस्काराच्या धर्तीवर**
**उद्योगरत्न, उद्योगमित्र, उद्योगिनी,**
**उत्कृष्ट मराठी उद्योजक पुरस्कार व**
**त्याचे स्वरूप निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक २०२३/प्र.क्र. १०२/उद्योग-७,**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२३

**प्रस्तावना :**

“महाराष्ट्र भूषण” पुरस्काराच्या धर्तीवर उद्योग क्षेत्रातील उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या उद्योजकांचा सन्मान करण्याकरीता मा. मुख्यमंत्री महोदय, मा. उपमुख्यमंत्री (गृह आणि विधी व न्याय विभाग), मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन विभाग) आणि मा. मंत्री (उद्योग) यांचा समावेश असलेल्या समितीची बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये उद्योगरत्न, उद्योगमित्र, उद्योगिनी व उत्कृष्ट मराठी उद्योजक हे पुरस्कार उद्योग क्षेत्रातील नामवंत व्यक्तींना देण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार सन २०२३ पासून उद्योग क्षेत्रातील नामवंत व्यक्तींना पुरस्कार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

राज्याच्या उद्योग क्षेत्रातील उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या उद्योजकांचा उद्योगरत्न, उद्योगमित्र, उद्योगिनी व उत्कृष्ट मराठी उद्योजक हे पुरस्कार सन २०२३ पासून खालीलप्रमाणे निश्चित केल्यानुसार वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पुरस्काराचे नाव** | **पुरस्काराचे स्वरूप** |
|---|---|---|
| १. | उद्योगरत्न | रु. २५ लक्ष रोख, सन्मानचिन्ह, मानपत्र. |
| २. | उद्योगमित्र | रु. १५ लक्ष रोख, सन्मानचिन्ह, मानपत्र. |
| ३. | उद्योगिनी | रु. ५ लक्ष रोख, सन्मानचिन्ह, मानपत्र. |
| ४. | उत्कृष्ट मराठी उद्योजक | रु. ५ लक्ष रोख, सन्मानचिन्ह, मानपत्र. |

२. सदर पुरस्काराकरीता तसेच पुरस्कार वितरण सोहळ्यासाठी येणारा खर्च हा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून त्यांच्या उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०८१४१७०९२९१९१० असा आहे.

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2023.08.17 13:18:01 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव.

२) मा. उपमुख्यमंत्री ( गृह व विधी व न्याय विभाग) यांचे प्रधान सचिव.

३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन विभाग) यांचे प्रधान सचिव.

४) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई.

६) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

७) निवडनस्ती (उद्योग-७)